**भूसंपादन आस्थापना: विभागीय आयुक्त, कोकण कोकण विभागातील भूसंपादन आस्थापनेवरील ३५ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. अपमु-२०२३/प्र.क्र.२४२/अ-२**
**ई-ऑफिस क्र.६७०१०४.**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- २७.०३.२०२५.

वाचा : १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.एलक्यूएन ३१७१/क्यू,दि.४.०८.१९७२
२) विभागीय आयुक्त, कोकण यांचे पत्र क्र.भूसं/टे-२/ पदांबाबत आढवा/ मुदतवाढ /२४-२५/२०२४, दि.१८.०३.२०२४ रोजीचे पत्र.
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२१.०२.२०२४.
४) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.अपुम-२०२३३/प्र.क्र.२४२/अ-२,दि.२.४.२०२४ व शासन शुद्धीपत्रक दि.०६.०५.२०२४.
५) विभागीय आयुक्त, कोकण यांचे पत्र क्र.भूसं/कार्या-२/मुदतवाढ/२०२४,दि.३०.७.२०२४ व दि.१८.१०.२०२४.
६) वित्त विभाग,शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.६.९.२०२४.
७)महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.अपुम-२०२३३/प्र.क्र.२४२/अ-२,दि.२३.१०.२०२४.
८) विभागीय आयुक्त, कोकण यांचे पत्र क्र.भूसं/टे-२/मुदतवाढ/३५ पदे-/२०२५-२६, दि.०५.०२.२०२५.
९) वित्त विभाग,शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.०३.०३.२०२५.

**प्रस्तावना :-**

वित्त विभाग, शासन निर्णय दि.०३.०३.२०२५ अन्वये, दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ या कालावधी करीता अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत प्रशासकीय विभागांना अधिकार प्रदान करणेबाबत मान्यता देण्यात आली आहे.

विभागीय आयुक्त, कोकण, यांनी त्यांच्या दि.०५.०२.२०२५ च्या पत्रान्वये, त्यांच्या अधिनस्त असलेल्या भूसंपादन कार्यालयातील अस्थायी पदांना मुदतवाढ देणेबाबत विनंती केली आहे. यापूर्वी उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णय क्र. ७ अन्वये, दि.०१.०९.२०२४ ते दि.२८.२.२०२५ पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ प्रदान करण्यात आलेली आहे. त्याच धर्तीवर भूसंपादन कार्यालयामध्ये कार्यरत पदांचा आकृतीबंध निश्चित झालेला नसल्यामुळे वित्त विभागाने प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करून विभागीय आयुक्त, कोकण यांचे अधिनस्त विभागातील भूसंपादन कार्यालयातील अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णय क्र. ७ अन्वये कोकण विभागातील मुंबई शहर, मुंबई उपनगर, ठाणे व पालघर जिल्हयातील भूसंपादन कामी कार्यरत असलेल्या पथकातील एकूण ३५ अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२४ ते दि.२८.०२.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली होती. सोबत जोडलेल्या तक्ता (अ) मध्ये दर्शविलेली सदर एकूण ३५ अस्थायी पदे दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत चालू ठेवण्यास पुढील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे-

१) अतिरिक्त ठरविण्यात आलेल्या पदावरील अधिकारी / कर्मचारी यांना विभागामार्फत रिक्त पदावर सामावून घेण्यात आले आहे अथवा वित्त विभागाकडील अतिरिक्त संवर्ग कक्षाकडे वर्ग करण्यात आले आहे.

२) अतिरिक्त ठरविण्यात आलेल्या पदांवरील कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्ते यांचे प्रदान कोणत्याही परिस्थितीत विभागातील कायम / स्थायी, अस्थायी पदांसाठीच्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून करण्यात येत नाही.

३) प्रस्तावाधीन प्रकरणामध्ये मुदतवाढ प्रस्तावित करण्यात आलेल्या पदांपैकी कोणतेही पद ६ महिन्यांपेक्षा अधिक कालावधीसाठी रिक्त नाही अथवा अतिरिक्त कार्यभाराने चालू ठेवलेले नाही. उपजिल्हाधिकारी (भूसंपादन) क्रमांक ७, मुंबई उपनगर जिल्हा या कार्यालयाच्या पथकातील लिपिक पदांपैकी २ पदे रिक्त आहेत. त्यांपैकी एक पद सन-२००६ पासून रिक्त आहे. परंतु शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक १०.९.२००१ मधील परिच्छेद ३ (३.२) मधील तरतुदीनुसार सदर पदे व्यपगत होणार नसल्याचे विभागीय आयुक्त, कोकण विभाग यांच्या कार्यालयाने दिनांक २१.५.२०११ रोजीच्या पत्रान्वये शासनास कळविलेले आहे. सदर पदे वित्त विभागाच्या उपरोक्त शासन निर्णयातील तरतुदीनुसार व्यपगत होणार नसतील, तरच सदर पदांना सदरहू शासन निर्णयानुसार मान्यता देण्यात येत आहे. सदर शासन निर्णयाच्या तरतुदींमध्ये ही बाब बसत नसेल, तर सदर पदांना मुदतवाढ देण्यात येऊ नये. सदर शासन निर्णयातील तरतूदीस विसंगत कार्यवाही करण्यात आल्यास व त्यामुळे काही अडचणी उद्भवल्यास त्यास संबंधित कार्यालय जबाबदार राहील.

४) सदर अस्थायी पदांच्या वेतनाचा खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

५) सदर पदांचा अस्थायी पदांच्या आढाव्यामध्ये समावेश आहे.

२. ही सर्व पदे संबंधित विभागाच्या स्थायी संवर्गातील तात्पुरती भर म्हणून समजण्यात यावी.

३. सदरहू पदांवरील पदधारक शासनाच्या वेळोवेळी निघालेल्या आदेशांप्रमाणे महागाई भत्ता व इतर पूरक भत्ते मिळण्यास पात्र राहतील.

४. यावर होणारा खर्च (तक्ता (अ) मधील अ.क्र.२ येथील बाब वगळून ) मुख्य लेखाशीर्ष मागणी क्र.-सी-१-२०२९-जमीन महसूल-००१ संचालन व प्रशासन (०२) भूमी संपादन आस्थापना

(योजनांतर्गत) (०२) (०१) आयुक्त, कोकण (०१) वेतने - (२०२९ ०१८२) आणि -२०२९-जमीन महसूल-००१ संचालन व प्रशासन (०१) भूमी संपादन आस्थापना (योजनेतर) (०१) (०१) आयुक्त, (०१) वेतने - (२०२९ ००४६) तसेच तक्ता (अ) मधील बाब क्र. २ वर होणारा खर्च -२०२९-जमीन महसूल-००१ संचालन व प्रशासन (०१) भूमी संपादन आस्थापना (योजनेतर) (०२) (०८),- जिल्हाधिकारी, मुंबई (विशेष भूसंपादन अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण यांच्याकरिता (०१) वेतने - (२०२९ ०१६२) या लेखाशीर्षाखाली सोबतच्या तक्ता (अ) मध्ये दर्शविल्याप्रमाणे खर्ची टाकून तो वित्तीय वर्ष २०२५-२०२६ साठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व वर्षअखेर तो संबंधित संपादक विभागाकडे (महसूल व वन विभागखेरीज) वर्ग करण्यात यावा.

**५.** सदर पदांच्या आवश्यकतेबाबत दि.३१.०८.२०२५ पूर्वी आढावा पूर्ण करण्याच्या अधीन राहून सदर मान्यता देण्यात येत आहे.

**६.** सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०३.०३.२०२५ अन्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

विभागीय आयुक्त, कोकण यांनी त्यांच्या आस्थापनेवरील व नियंत्रणाखालील कार्यालयांच्या आस्थापनेवरील मंजूर पदांचा आढावा घ्यावा. पदांचा आढावा घेताना शासनाच्या कार्यपद्धतीतील तंत्रज्ञानाचा वाढता वापर, काळानुरुप शासनाच्या मनुष्यबळात बदल व मनुष्यबळाच्या परिणामकारक वापराची आवश्यकता या बाबींचा विचार करुन अनावश्यक पदे कमी करण्याचाही विचार करावा. दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ या कालावधीमध्ये आढाव्यास (नव्याने निर्माण केलेल्या पदांसह) उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेऊन सुधारित आकृतिबंध निश्चित करणे आवश्यक आहे. सबब, त्याबाबतचे प्रस्ताव विहित कालावधीत शासनास सादर करण्याची कार्यवाही करावी. अन्यथा, मुदतवाढीअभावी सदर अस्थायी पदांना वेतनाचा प्रश्न उद्भवल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी आपल्या कार्यालयाची राहील याची नोंद घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२५०३२७१८४००८५६१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MANIK VITTHAL DHAMALE

Digitally signed by MANIK VITTHAL DHAMALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=56ec16312a634dd1d6237d2d17aa0f5fb47d9a2353765a9688e57f460b5271d9, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=D2C09929ACAFC324A4E5E44875953A3AEF77C004844BEE29381808FC25AAC97F, cn=MANIK VITTHAL DHAMALE
Date: 2025.03.27 18:41:06 +05'30'

**( माणिक ढमाले )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**सोबत :** तक्ता-अ

**प्रति,**

१. महालेखापाल-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई (३ प्रती)

२. महालेखापाल-२, महाराष्ट्र राज्य, नागपूर (३ प्रती)
३. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई (५ प्रती)
४. जमाबंदी आयुक्त व संचालक, भूमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. संचालक, नगररचना व मूल्यनिर्धारण, पुणे
६. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
७. जिल्हाधिकारी, मुंबई शहर जिल्हा, मुंबई उपनगर जिल्हा, पालघर जिल्हा व ठाणे जिल्हा (प्रत्येकी ५ प्रती)
८. व्यवस्थापकीय संचालक, सिडको, निर्मल बिल्डिंग, नरिमन पॉईंट, मुंबई २१.
९. सर्व संबंधित विशेष भूसंपादन अधिकारी, मुंबई शहर, मुंबई उपनगर, पालघर व ठाणे जिल्हा
१०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११.निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
१२.जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे, पालघर.
१३.नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१४.उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
१५.वित्त विभाग, व्यय-९, मंत्रालय, मुंबई
१६.वित्त विभाग, अर्थसंकल्प-१९, मंत्रालय, मुंबई
१७.जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८.गृहनिर्माण व विशेष साहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९.कार्यासन अ-१/अ-३/अ-४/ब-१/ई-४/ई-६/ई-७/ई-८/र-१२/ल-१, महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई
२०.निवडनस्ती (अ-२).

| | | | | |
|---|---|---|---|---|
| **शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक: अपमु-२०२३/प्र.क्र.२४२/अ-२, दिनांक: २७.०३.२०२५.** | | | | |
| **तक्ता अ** | | | | |
| कोकण विभागातील भूसंपादन आस्थापनेवर विशेष भूसंपादन अधिकाऱ्यांची व त्यांच्या कर्मचाऱ्यांची दिनांक.२७.०३.२०२५ पर्यंत मंजूर केलेली पदे. | | | | |
| अ. क्र. | पदनाम | कर्मचारीवृंद | पदांची संख्या | योजनेतर वा योजनांतर्गत |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| **मुंबई शहर जिल्हा** | | | | |
| १ | उपजिल्हाधिकारी (भूसंपादन), मुंबई | १) विशेष भूसंपादन अधिकारी | १ | योजनेतर |
| | | २) अव्वल कारकून | १ | |
| | | ३) लिपिक | २ | |
| | | ४) नोटीस वाहक | १ | |
| | | ५) शिपाई | १ | |
| | | **एकूण** | **६** | |
| **मुंबई उपनगर जिल्हा** | | | | |
| २ | उपजिल्हाधिकारी (भूसंपादन) क्र. ७, मुंबई व मुंबई उपनगर जिल्हा | १) विशेष भूसंपादन अधिकारी | १ | योजनेतर |
| | | २) अव्वल कारकून | १ | |
| | | ३) लिपिक/टंकलेखक | ३ | |
| | | ४) शिपाई | १ | |
| | | **एकूण** | **६** | |
| **ठाणे जिल्हा** | | | | |
| ३ | उपजिल्हाधिकारी (भूसंपादन), लघु पाटबंधारे ५ वा माळा, ठाणे | १) शिपाई | २ | योजनेतर |
| | | **एकूण** | **२** | |
| ४ | उपजिल्हाधिकारी (भूसंपादन), मेट्रो सेंटर क्रमांक ३, ठाणे | १) उपजिल्हाधिकारी (भूसंपादन) | १ | |
| | | २) नायब तहसीलदार | १ | |
| | | ३) लघुलेखक (निम्न श्रेणी) | १ | |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | ४) सहा. महसूल अधिकारी | ४ | योजनांतर्गत |
| | | ५) मंडळ अधिकारी | १ | |
| | | ६) महसूल सहाय्यक | १ | |
| | | ७) शिपाई | १ | |
| | | **एकूण** | **१०** | |
| | | **पालघर जिल्हा** | | |
| ५ | विशेष भूसंपादन अधिकारी, पथक जि. पालघर | १) विशेष भूसंपादन अधिकारी | १ | योजनेतर |
| | | २) मंडळ अधिकारी | २ | |
| | | ३) अव्वल कारकून/ उपलेखापाल | ३ | |
| | | ४) वरिष्ठ लेखा लिपिक | १ | |
| | | ५) लिपिक-टंकलेखक | ३ | |
| | | ६) शिपाई/ पाहरेकरी | १ | |
| | | **एकूण** | **११** | |
| | | **पदांची एकूण संख्या** | **३५** | |

MANIK VITTHAL DHAMALE

Digitally signed by MANIK VITTHAL DHAMALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=56ec16312a634dd1d6237d2d17aa0f5fb47d9a2353765a9688e57f460b5271d9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D2C09929ACAFC324A4E5E44875953A3AEF77C004844BEE29381808FC25AAC97F, cn=MANIK VITTHAL DHAMALE
Date: 2025.03.27 18:41:34 +05'30'

**( माणिक ढमाले )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**